उर्ध्व गोदावरी उपखो-यात एकात्मिक जलसंपत्ती
व्यवस्थापन सिस्टिम राबविणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**जलसंपदा विभाग**

**शासन निर्णय क्रमांकःप्रशामा २०१४/(७४/२०१४)/जसंअ**

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

दिनांक: १९.०८. २०१४

**संदर्भ -** १) महाराष्ट्र व न्यू साऊथ वेल्स यांच्यातील दि.०२.११.२०१२ रोजीचा सामंजस्य करार

२) मा. मंत्री, जलसंपदा (कृखोपाम वगळून) यांचे न्यु साऊथ वेल्स प्रिमिअर प्रतिनीधींना चिन्हांकित केलेले दि.०५.१२.२०१३ चे पत्र

३) न्यू साऊथ वेल्स ऑस्ट्रेलिया यांचे मा.मंत्री, जलसंपदा (कृखोपाम वगळून) यांना चिन्हांकित केलेले दि.०५.१२/२०१३ चे पत्र

४) सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्र. सीईआर १०१३/२३९२/३०, दि.०१.०३.२०१४ चे पत्र

५) शासनाचे संकिर्ण २०१२/(८९१/२०१२)/ सिंव्य (धो.), दि.२४.०३.२०१४ चे पत्र

६) महासंचालक, जल व भूमि व्यवस्थान संस्था (वाल्मी), औरंगाबाद यांचे क्र. वाल्मी/अभियांत्रिकी विशा/२१८४/२०१४, दि.२५.०४.२०१४ चे पत्र

**प्रस्तावना :**

गोदावरी खोऱ्यातील उर्ध्व गोदावरी (पैठण धरण स्थळापर्यंत) उपखोरे नाशिक, अहमदनगर व औरंगाबाद या जिल्हयात येते. त्याचे पाणलोट क्षेत्र २१७७४ चौ.कि.मी. असून त्यामध्ये मुळा, प्रवरा, गोदावरी -दारणा, गंगापूर, पालखेड व पैठण या प्रमूख जलाशय समुहांचा समावेश आहे. या उपखोऱ्यात १७ मोठे १४, मध्यम व ५५८ लघुसिंचन प्रकल्प बांधण्यात आले आहेत. या उपखोऱ्यातील उपलब्ध जलसंपत्ती पेक्षा पाण्याची मागणी जास्त असून उपखो- यामध्ये पाण्याची तूट निर्माण झाली आहे.

यामुळे उर्ध्व गोदावरी उपखोऱ्यातील जलाशयांचे एकात्मिक प्रवर्तनासाठी विनियमची आवश्यकता निर्माण झाली. त्याअनुषंगाने शासनाने दिनांक २९ जानेवारी २०१३ च्या आदेशाद्वारे अभ्यास गटाची नियुक्ती केली. या अभ्यास गटाने अहवाल शासनास दिनांक १२ऑगस्ट २०१३ रोजी सादर केला.

२.० या अभ्यासगटामुळे पाणलोट क्षेत्रातील पर्जन्यमान, नदी प्रवाह यांचा अद्यावत तपशील (रिअल टाईम डाटा अक्वीझिशन सिस्टीम) एकत्रित करुन त्याआधारे उपखो-यातील सर्व जलाशयाचे एकात्मिक प्रचलन करावे अशी शिफारस केली. ऑस्टेलियातील मरे-डार्लींग नदी खोरे व गोदावरी नदी खो-यात ब-याच बाबतीत साधर्म्य आहे. सदर मरे-डार्लींग खो-यात संगणक प्रणाली द्वारे जलसंपत्तीचे विनियमन केले जाते. या धर्तीवर उर्ध्व गोदावरी उप खो-यात संगणकीय प्रणालीद्वारे जलसंपत्तीचे विनियमन करण्याचा निर्णय शासनाने घेतला. यासाठी ऑस्टेलियातील न्यु साऊथ वेल्स प्राताशी सामंजस्य करार करणेत आला.

४.० या पार्श्वभूमीवर महासंचालक, जल व भूमी व्यवस्थापन संस्था, औरंगाबाद यांनी दि.२५.०४.२०१४ चे पत्रान्वये उर्ध्व गोदावरी उपखो-यात एकात्मिक जलसंपत्ती व्यवस्थापन सिस्टिम राबविणेसाठीचा सविस्तर प्रकल्प अहवाल प्रशासकीय मान्यतेसाठी सादर केला होता. सदर अहवालास प्रशासकीय मान्यता देणे शासनाच्या विचाराधीन होते.

**शासन निर्णय**

उर्ध्व गोदावरी उपखोऱ्यामध्ये एकात्मिक जलसंपत्ती व्यवस्थापन करण्यासाठी संशोधन व विकास अभ्यास प्रकल्प ( R & D Study Project ) राबविण्याचे प्रस्तावित असून त्यासाठी रु. ५४.५५ कोटी अंदाजित किंमतीच्या सविस्तर प्रकल्प अहवालास खालील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

१) सदर प्रकल्प राबविण्याकरिता जलसंपदा विभागातील अधिका-यांची क्षमता बांधणी (Capacity Building ) करण्यासाठी त्यांना मरे डार्लिंग खो-यात (ऑस्ट्रेलिया ) कार्यस्थळी दीर्घकालीन प्रशिक्षित करण्यात येणार आहे. या प्रकल्पांतर्गत ज्या अधिका-यांना प्रशिक्षण देण्यात येणार आहे. अशा सर्व अधिका-यांनी प्रशिक्षणानंतर किमान २ वर्षे शासन सेवा करणे आवश्यक राहील अशा स्वरुपाचे बंधपत्र त्यांच्याकडून घेण्यात यावे.

२) या प्रकल्पासाठी प्रशिक्षित केलेल्या अधिका-यांच्या सेवा या प्रकल्पासाठीच उपयोगात आणण्यात याव्यात. प्रशिक्षणानंतर सदर अधिकाऱ्यांच्या २ वर्षापर्यंत इतरत्र बदल्या करु नयेत.

सदर योजनेचा खर्च मागणी क्र. आय -५, मुख्य लेखाशिर्ष -४७०१ मोठे व मध्यम पाटबंधारे यावरील भांडवली खर्च (योजनांतर्गत) (८०) सर्वसाधारण (८००) इतर खर्च (०७) (०१) जलविज्ञान प्रकल्प (४७०१ आय ९७५) या लेखाशीर्षाखाली टाकावा व त्यामधील खर्च मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

हा शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौ.संदर्भ क्र.१४१/का. १४३४, दि.०७.०६.२०१४ व वित्त विभागाच्या अनौ.संदर्भ क्र.३१७/व्यय-१२, दि.०२.०८.२०१४ अन्वये दिलेल्या सहमतीच्या अनुषंगाने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक २०१४०८१९१५५६०९६५२७ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pramod Govindrao Mandade

Digitally signed by Pramod Govindrao Mandade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Pramod Govindrao Mandade
Date: 2014.08.19 15:54:35 +05'30'

( प्र.गो.मांदाडे )

उपसचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखा परिक्षा), नागपूर/मुंबई
२. मा.मंत्री, जलसंपदा विभाग (कृखोपाम वगळून) यांचे खाजगी सचिव
३. सचिव, महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरण, मुंबई.
४. प्रधान सचिव जलसंपदा, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. प्रधान सचिव लाक्षेवि, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. महासंचालक, जल व भूमि व्यवस्थान संस्था (वाल्मी ), औरंगाबाद
७. कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद
८. मुख्य अभियंता (जसं) व सहसचिव, मंत्रालय, मुंबई
९. आंतर वित्त सल्लागार व सहसचिव, मंत्रालय, मुंबई
१०.उपसचिव (जसंअ) , मंत्रालय, मुंबई

११.जसंअ कार्यासन संग्रहार्थ.

## शासन निर्णय क्र. प्रशामा २०१४/(७४/२०१४)/ जसंअ, दि. १९.०८.२०१४ चे जोडपत्र

| अ.क्र. | शिर्षक | | किंमत |
|---|---|---|---|
| १ | टप्पा-१ : एकात्मिक जलसंपत्ती व्यवस्थापनासाठी मॉडेलिंग फ्रेमवर्क | : | रु. १०४४.०० लक्ष |
| २ | टप्पा- २ : रिअल टाईम डेटा संकलन पध्दती | : | रु. ३७९४.८० लक्ष |
| ३ | टप्पा- ३ : क्षमता बांधणी व आंतरराष्ट्रीय दौरे / प्रशिक्षण | : | रु. १६१.२० लक्ष |
| | एकूण कामाप्रित्यर्थ | : | रु. ५००० .०० लक्ष |
| ४ | आस्थापना | : | रु. ४५४ .५० लक्ष |
| | एकूण | : | रु. ५४५४ .५० लक्ष |